**प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, नंदूरबार यांच्या कार्यक्षेत्रातील ८ शासकीय आश्रमशाळा येथील इमारत संकुल बांधकामाचे अंदाजपत्रके व आराखड्यांना प्रशासकीय मान्यता देण्याबाबत....**

महाराष्ट्र शासन
आदिवासी विकास विभाग,
शासन निर्णय क्रमांक : शाआबां-२०१०/प्र.क्र.४१८/का.१३
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १९ ऑक्टोबर, २०१०.

वाचा :- १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांचे पत्र क्र.अशा.जा.क्र.का-३/इमा/५५/२०१०, दि.२०/०७/२०१०.
२) शासनाचे पत्र क्र.बैठक-२०१०/प्र.क्र.३५५/का.१३, दि.३/८/२०१०.
३) आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांचे पत्र क्र.शाआवबां-२०१०/प्र.क्र.२४/का.८(२) दिनांक ३ सप्टेंबर, २०१०.
४) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई यांचा शासन निर्णय क्र:मातंसं/नस्ती २०१०/प्र.क्र.३४/३९, दि.६/८/२०१०.

**शासन निर्णय** : आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक यांनी त्यांचे दि.३/९/२०१० च्या पत्रान्वये प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, नंदूरबार यांच्या कार्यक्षेत्रातील खालील तक्त्यात दर्शविलेल्या ८ शासकीय आश्रमशाळा येथील इमारत संकुल बांधकाम करण्याबाबतचे सविस्तर अंदाजपत्रके व आराखडे प्रशासकीय मान्यतेसाठी शासनास सादर केले आहे.

| अ.क्र. | प्रकल्प | शासकीय आश्रमशाळेचे नांव | तालुका | जिल्हा | अंदाजपत्रकीय रक्कम (रुपये) |
|---|---|---|---|---|---|
| १ | नंदूरबार | पांगण | साक्री | धुळे | ८,६१,१४,१९९/- |
| २ | | शेवगे | साक्री | धुळे | ५,५७,३३,०२६/- |
| ३ | | बोपखेल | साक्री | धुळे | ५,६९,५४,८१७/- |
| ४ | | उमरपाटा | साक्री | धुळे | ५,६०,७५,१०९/- |
| ५ | | शिरसोले | साक्री | धुळे | ५,६०,९१,००४/- |
| ६ | | रोहोड | साक्री | धुळे | ५,७०,५४,४४३/- |
| ७ | | वाघाळे | नंदूरबार | नंदूरबार | २,६९,२३,४६६/- |
| ८ | | कोठली | नंदूरबार | नंदूरबार | २,७८,२५,३४८/- |

सदर कामास प्रशासकीय मान्यता देण्याच्या अनुषंगाने उपरोक्त तक्त्यातील शासकीय आश्रमशाळेचे सविस्तर अंदाजपत्रके व आराखडे तांत्रिक मान्यतेसाठी सार्वजनिक बांधकाम विभागाकडे पाठविण्यात आले होते.

२. सदर सविस्तर अंदाजपत्रके व आराखडे संबंधित शाखा अभियंता यांनी तयार केले असून संबंधित उपविभागीय अधिकारी, सार्वजनिक बांधकाम उप विभाग यांनी तपासले आहे. तसेच संबंधित कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग व अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, धुळे यांनी साक्षांकित केली आहेत.

३. उपरोक्त शासकीय आश्रमशाळेंचे अंदाजपत्रके सन २००९-१० च्या दरसूचीवर आधारित आहे. सदर शासकीय आश्रमशाळेंच्या अंदाजपत्रकात आवश्यक त्या सुधारणा/दुरुस्त्या केल्यानंतर खालील तक्त्यात दर्शविलेल्या अंदाजपत्रकीय रकमेस पुढील अटींच्या अधिन राहून सार्वजनिक बांधकाम विभागाने तांत्रिक सहमती दिलेली आहे.

| अ.क्र. | प्रकल्प | शासकीय आश्रमशाळेचे नांव | तालुका | जिल्हा | अंदाजपत्रकीय रक्कम (रुपये) |
|---|---|---|---|---|---|
| १ | नंदूरबार | पांगण | साक्री | धुळे | ८,७४,१८,९९४/- |
| २ | | शेवगे | साक्री | धुळे | ५,६५,७०,४२०/- |
| ३ | | बोपखेल | साक्री | धुळे | ५,८२,५८,८७२/- |
| ४ | | उमरपाटा | साक्री | धुळे | ५,७३,७९,९०४/- |
| ५ | | शिरसोले | साक्री | धुळे | ५,७३,९५,७९९/- |
| ६ | | रोहोड | साक्री | धुळे | ५,८३,५९,२३८/- |
| ७ | | वाघाळे | नंदूरबार | नंदूरबार | २,४४,४१,९८४/- |
| ८ | | कोठली | नंदूरबार | नंदूरबार | २,४४,५७,३०५/- |

<u>अटी :-</u>

**(अ)** काम सुरु करण्यापूर्वी मांडणी नकाशा तसेच वापरावयाच्या नमुना नकाशास व विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजूरी घेऊनच सुरु करावे.

**(ब)** काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करुन घ्यावी.

**(क)** ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतूदींबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करुनच काम हाती घ्यावे.

४. तरी प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, नंदूरबार यांचे कार्यक्षेत्रातील उपरोक्त तक्त्यातील शासकीय आश्रमशाळा इमारत संकुल बांधकामाच्या सविस्तर अंदाजपत्रकातील सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी सूचविल्याप्रमाणे विद्युतीकरणाची तरतूद ११ % व बाह्य पाणीपुरवठ्याची तरतूद ८% करण्यात येत आहे. तसेच सेंटेज चार्जेसची व भाववाढीची तरतूद वगळून उपरोक्त परिच्छेद -३ मध्ये दर्शविण्यात आलेल्या तकत्यातील अंदाजपत्रकीय रक्कमेस **(अ), (ब)** व **(क)** येथील व **<u>सदर बांधकामासाठी निधी उपलब्ध झाल्याशिवाय बांधकाम सुरु करु नये</u>** या अटींच्या आधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

५.  मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी सु मोटो रिट याचिका क्र.१४२०/२००८ प्रकरणी वेळोवेळी दिलेल्या निर्देशानुसार शासकीय आश्रमशाळांमध्ये चांगल्या सोयीसुविधा पुरविणे आवश्यक आहे. सदर काम सुरु होण्यापूर्वी व काम पूर्ण झाल्यावर त्याचे व्हीडीओ शुटींग करुन त्याची सी.डी.शासनास सादर करण्यात यावी.

६.  शासन निर्णय, वित्त विभाग क्र.विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दिनांक १५ मे, २००९ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग-पहिला, उपविभाग-पाच मधील अ.क्र.१ व सा.बां.विभाग नियम पुस्तिकेतील परिच्छेद १३४ नुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७.  सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यांत आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक **२०१०१०१९१५३१३५००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( ला.स.गुजर )
अवर सचिव

**प्रति,**

आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, धुळे.
प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, नंदूरबार.
महालेखापाल (लेखा परिक्षा), (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
महालेखापाल (लेखा परिक्षा), (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, नागपूर.
जिल्हा कोषागार अधिकारी, धुळे/नंदूरबार.
श्री.सी.डी.वाघ,कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, मालेगांव (समन्वय अधिकारी)
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, धुळे/नंदूरबार.
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, मालेगांव.
उप विभागीय अधिकारी, सार्वजनिक बांधकाम उपविभाग, पिंपळनेर, जि.धुळे.
उप विभागीय अधिकारी, सार्वजनिक बांधकाम उपविभाग, क्र.१, नंदूरबार.
कक्ष अधिकारी (इमारती-२), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
कक्ष अधिकारी (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
निवड नस्ती (का.१३), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

F:\BACKUP\D\2010\Construction\P.W.D\ATC Nashik\P.O.NandurbarC.R.418.lwp